कृषी उन्नती योजना - राष्ट्रीय अन्न सुरक्षा अभियान (तेलबिया व वृक्षजन्य तेलबिया) अंतर्गत सन २०१८-१९ करिता अनुसूचित जमाती प्रवर्गाचा ₹ १६०.८४९९९ लाख निधी वितरीत करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : रागते-१०१८/प्र.क्र. ७३/४अे**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई - ४०० ०३२
दिनांक : ३० जून, २०१८.

**वाचा:-**

१. केंद्र शासनाचे अभियाना संदर्भात http://agricoop.nic.in/dacdiviion/dacdiviion/NMOOP२०१४.pdf या संकेतस्थळावर उपलब्ध करुन दिलेल्या मार्गदर्शक सूचना
२. वित्त विभागाचे परिपत्रक क्र. अर्थसं-२०१८/प्र.क्र.६९/अर्थ-३ दि. ०२/०४/२०१८.
३. कृषी व पदुम विभाग शासन निर्णय क्र.०४१८/प्र. क्र१५५/१४-अे, दि.२७/०४/२०१८.
४. केंद्र शासनाचे पत्र क्र.४-१/२०१८-NFSM(OS &OP),दि.०८ मार्च, २०१८.
५. केंद्र शासनाचे पत्र क्र.४-१/२०१८-NFSM(OS &OP),दि.०२ मे, २०१८.
६. केंद्र शासनाचे पत्र क्र.६-१३/२०१८- AAP(Coord./OS), दि.११ जून, २०१८.
७. कृषी व पदुम विभाग शासन निर्णय क्र.अेअेपी-२०१८/प्र.क्र.४६/४-अे, दि.१६ मे, २०१८.
८. कृषी व पदुम विभाग शासन निर्णय क्र.अेअेपी-२०१८/प्र.क्र.४६/४-अे, दि.२० जून, २०१८.
९. केंद्रीय कृषी मंत्रालयाचे पत्र-१४-१/२०१७-CA-II, दिनांक २८मे,.२०१८
१०. कृषी आयुक्तालयाचे पत्र क्र.वि.प्र.२/राअसु(गळीत)१८-१९/नि.वि./प्र.क्र.६०९२/१८, दि.३० मे, २०१८.
११. आदिवासी विकास विभागाचे शासन निर्णय क्र.बीसुडी-२०१८/प्रक्र.११/कार्या.६,दि.२७ जून,१८.

**प्रस्तावना :-**

तेलबियांच्या उत्पादनात वाढ करण्यासाठी केंद्र पुरस्कृत राष्ट्रीय तेलबिया व तेलताड अभियान [National Mission on Oilseed and Oil Palm (NMOOP)] सन २०१४-१५ पासून राज्यात राबविण्यात येत आहे. सदर अभियानाअंतर्गत लघुअभियान-१ (तेलबिया), लघुअभियान-२ (तेलताड) व लघुअभियान-३ (वृक्षआधारित तेलबिया) या तीन लघुअभियानांचा समावेश आहे.तथापि, सद्यस्थितीत लघुअभियान-१ व लघुअभियान-३ या दोनच अभियानाची अंमलबजावणी करण्यात येत आहे. यामध्ये केंद्र व राज्य हिश्श्याचे प्रमाण ६०:४० असे आहे.

केंद्र शासनाने दि.०८/०३/२०१८ च्या पत्रान्वये पूर्वीचे राष्ट्रीय तेलबिया व तेलताड अभियानाचा सन २०१८-१९ पासून राष्ट्रीय अन्न सुरक्षा अभियानाअंतर्गत लघु अभियान-१ (तेलबिया) व लघु अभियान-३ (वृक्षजन्य तेलबिया) म्हणून समावेश केला आहे. सदर योजनेचा केंद्र हिस्सा व राज्य हिस्सा मुलभूत बियाणे खरेदी (१०० केंद्र हिस्सा) ही बाब वगळता इतर बाबींसाठी पूर्वी प्रमाणेच (६०:४०) राहील.

केंद्र शासनाने सदर अभियान सन २०१८-१९ या वर्षात राबविण्यासाठी दि.११ जून, २०१८ च्या पत्रान्वये गतवर्षीच्या प्रलंबित दायीत्वासह ₹७९००.९१ लाख एवढया रकमेच्या कार्यक्रमास सुधारीत मान्यता दिलेली आहे. यामध्ये केंद्र हिस्सा ₹४८५६.०० लाख व राज्य हिस्सा ₹३०४४.९१ लाख एवढया रकमेचा समावेश आहे. सदर कार्यक्रमास दि.२० जून, २०१८ रोजीच्या शासन निर्णयान्वये सुधारीत प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे.

केंद्र शासनाने दिनांक २८ मे, २०१८ च्या पत्रान्वये अनुसूचित जमाती प्रवर्गाकरीता अभियानांतर्गत लघुअभियान-१ (तेलबिया) करीता पहिल्या हप्त्यापोटी केंद्र हिस्याचा ₹९५.६८ लाख निधी वितरीत केलेला आहे व त्या समरुप राज्य हिस्याचा ₹६३.७८६६६ लाख व लघुअभियान-३ (वृक्षजन्य तेलबिया) करीता पहिल्या हप्त्यापोटी केंद्र हिस्याचा ₹०.८३ लाख निधी वितरीत केलेला आहे व त्या समरुप राज्य हिस्याचा ₹०.५५३३३ लाख असा एकूण ₹१६०.८४९९९ लाख निधी वितरीत करण्याबाबत शासन पुढीलप्रमाणे निर्णय घेत आहे:-

**शासन निर्णयः**

१. सन २०१८-१९ करीता कृषी उन्नती योजना-राष्ट्रीय अन्न सुरक्षा अभियान (तेलबिया व वृक्षजन्य तेलबिया) सन २०१८-१९ या वर्षात राज्यात राबविण्यासाठी **अनुसूचित जमाती प्रवर्गासाठी** केंद्र व राज्य हिस्स्याचा मिळून एकूण **₹१६०.८४९९९ लाख (रुपये एक कोटी साठ लाख चौऱ्याऐंशी हजार नऊशे नव्याण्णव फक्त)** निधीच्या वितरणास मान्यता देण्यात येत आहे.सदर निधीपैकी केंद्र व राज्य हिस्साच्या निधीचे विवरण पुढीलप्रमाणे-

(₹ लाख)

| अ. क्र. | उपअभियान | अनुसूचित जमाती प्रवर्ग | | एकूण |
|---|---|---|---|---|
| | | केंद्र हिस्सा (६०%) | राज्य हिस्सा (४०%) | |
| १ | राष्ट्रीय अन्न सुरक्षा अभियान क्र.१ (तेलबिया) | ९५.६८ | ६३.७८६६६ | १५९.४६६६ |
| २ | राष्ट्रीय अन्न सुरक्षा अभियान क्र.३ ( वृक्षजन्य तेलबिया) | ०.८३ | ०.५५३३३ | १.३८३३३ |
| | **एकूण** | **९६.५१** | **६४.३३९९९** | **१६०.८४९९९** |

२. परि.क्र.१ नुसार कृषी उन्नती योजना-राष्ट्रीय अन्न सुरक्षा अभियान **लघुअभियान-१ (तेलबिया)** करीता उपलब्ध करुन देण्यात आलेल्या निधीपैकी केंद्र हिस्याचा **₹९५.६८ लाख निधी (रुपये पंच्च्याण्णव** लाख अडुसष्ट हजार फक्त) आयुक्त (कृषी) यांना अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीद्वारे वितरीत करण्यात येत असून सदर निधी खालील लेखाशिर्षांतर्गत सन २०१८-१९ करिता

अर्थसंकल्पित करण्यात आलेल्या तरतुदीतून आहरीत करून जिल्हा स्तरावरून PFMS प्रणालीद्वारे खर्ची टाकावा :-

मागणी क्रमांक टी-५

**२४०१- पीक संवर्धन**

**७९६ जनजाती क्षेत्र उपयोजना**

**(००) (१४) कृषि उन्नती योजना-राष्ट्रीय तेलबिया व तेलताड लघु अभियान-१ तेलबिया (के.पु.यो.) (केंद्र हिस्सा) (६०% ) (आक्षेउयो)**

**(२४०१ A४८६) ३३, अर्थसहाय्य**

३. परि.क्र.१ नुसार कृषी उन्नती योजना-राष्ट्रीय अन्न सुरक्षा अभियान **लघुअभियान-३ (वृक्षजन्य तेलबिया)** करीता उपलब्ध करुन देण्यात आलेल्या निधीपैकी केंद्र हिस्याचा **₹ ०.८३ हजार निधी (रु.त्र्याऐंशी हजार फक्त)** आयुक्त )कृषी (यांना अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीद्वारे वितरीत करण्यात येत असून सदर निधी खालील लेखाशिर्षांतर्गत सन २०१८-१९ - करिता अर्थसंकल्पित करण्यात आलेल्या तरतुदीतून आहरीत करून जिल्हा स्तरावरून PFMS प्रणालीद्वारे खर्ची टाकावा:-

**मागणी क्रमांक टी-५**

**२४०१- पीक संवर्धन**

**७९६ जनजाती क्षेत्र उपयोजना**

**(०१) जनजाती क्षेत्र उपयोजनांतर्गत योजना**

**(१६) कृषि उन्नती योजना-राष्ट्रीय तेलबिया व तेलताड लघु अभियान-३)**

**वृक्ष आधारीत तेलबिया) (के.पु.यो.)**

**(केंद्र हिस्सा ) (६०% ) (आक्षेउयो)**

**(२४०१ A५०१) ३३, अर्थसहाय्य**

तसेच कृषी उन्नती योजना-राष्ट्रीय अन्न सुरक्षा अभियान (तेलबिया व वृक्षजन्य तेलबिया) करिता वितरणास मान्यता देण्यात आलेला राज्य हिश्याचा **₹ ६४.३३९९९ लक्ष (अक्षरी रुपये चौसष्ट लक्ष तेहत्तीस हजार नऊशे नव्याण्णव फक्त)** निधी जिल्हा स्तरावर सन २०१८-१९ करिता जिल्हा नियोजन समितीच्या अखत्यारीत अर्थसंकल्पीत करण्यात आलेल्या तरतुदीतून आहरीत करून जिल्हा स्तरावरून PFMS प्रणालीद्वारे खर्ची टाकावा.

४. या शासन निर्णयान्वये राष्ट्रीय अन्न सुरक्षा अभियान-गळीतधान्य व तेलताड करीता उपलब्ध करुन देण्यात येणाऱ्या केंद्र व राज्य हिस्स्याच्या ₹ १६०.८४९९९ लक्ष रक्कमेचे जिल्हा निहाय/ कार्यालय निहाय वाटप करण्याकरिता संचालक (विस्तार व प्रशिक्षण) यांना प्राधिकृत करण्यात येत असून त्यांनी अभियानांतर्गत जिल्हानिहाय वाटप करावयाचा निधी BDS प्रणालीद्वारे विभागीय कृषि

सहसंचालकामार्फत जिल्हयांना वितरीत करावा व जिल्हा अधीक्षक कृषि अधिकारी यांना प्राप्त निधी आहरीत करुन जिल्हा स्तरावरून PFMS खातेवर जमा करावा व संपूर्ण अदायगी जिल्हा स्तरावरून PFMS वरच करावी.

५. या शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात येत असलेल्या केंद्र हिश्श्याच्या निधीच्या प्रमाणात आवश्यक राज्य हिश्श्याच्या निधीस जिल्हा नियोजन व विकास समितीच्या (DPDC) अखत्यारीतील तरतूदीस संबंधित जिल्हाधिकारी यांचेकडून वित्तिय मान्यता देण्यात यावी.

६. सदर निधी खर्च करताना संदर्भाधीन अ.क्र.१ येथील अभियानाच्या मार्गदर्शक सूचना अ.क्र.३ येथील दि.२७ एप्रिल, २०१८ च्या शासन निर्णय व संदर्भाधीन अ.क्र.७ येथील दि.१६ मे, २०१८ च्या शासन निर्णयातील अटी, शर्ती व विहित कार्य पध्दतीचे कटाक्षाने पालन करण्यात यावे.

७. हा शासन निर्णय आदिवासी विकास विभागाच्या मान्यतेने व वित्त विभागाचे शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०१८/प्र.क्र.६९/अर्थ-३ दि. ०२ एप्रिल, २०१८ नुसार विहीत केलेल्या अटींची पुर्तता होत असल्याने तसेच, सदर परिपत्रकानुसार या विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारांनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

८. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८०७०२१५१४३७९२०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Shrikant Chandrakant Andge

Digitally signed by Shrikant Chandrakant Andge
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Agriculture And ADF Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=5d5ab93b4e4f2fcd87e12fe19b8965025d482b1bee0fffaa62085c34db6bfd8c, serialNumber=d8d9626c9e038380cd235c048f20d7ce74cffd3a95f2ac3c192e9c991f358271, cn=Shrikant Chandrakant Andge
Date: 2018.07.02 15:18:02 +05'30'

**(श्रीकांत चं. आंडगे)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति:-**

१. मा. मंत्री (कृषी)यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
२. मा. राज्य मंत्री (कृषी) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
३. मा.विरोधी पक्ष नेता, विधानसभा, विधानमंडळ सचिवालय, मुंबई
४. मा.विरोधी पक्ष नेता, विधानपरिषद, विधानमंडळ सचिवालय, मुंबई
५. अपर मुख्य सचिव (कृषी), कृषी व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
६. आयुक्त (कृषी) कृषी आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे (५ प्रती)
७. संचालक (विस्तार व प्रशिक्षण), कृषी आयुक्तालय, पुणे

८. सहसंचालक (नियोजन), कृषी आयुक्तालय,महाराष्ट्र राज्य, पुणे-१
९. जिल्हाधिकारी, (सर्व)
१०. विभागीय कृषी सहसंचालक (सर्व)
११. जिल्हा अधीक्षक कृषी अधिकारी (सर्व)
१२. जिल्हा कोषागार अधिकारी (सर्व)
१३. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य बियाणे महामंडळ, शास्त्रीनगर, अकोला.
१४. सहसंचालक लेखा व कोषागारे, संगणक कक्ष, नवीन प्रशासकीय भवन,
पाचवा मजला, मंत्रालयासमोर, मुंबई
१५. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परिक्षा) महाराष्ट्र १ /२, मुंबई / नागपूर
१६. महालेखाकार( स्थानीय निकाय लेखापरिक्षा व लेखा), प्रतिष्ठा भवन,१०१ महर्षी कर्वे मार्ग,
मुंबई-४०० ०२०
१७. नियोजन विभाग (कार्यासन - १४३१ /कार्यासन - १४४४), मंत्रालय, मुंबई - ३२
१८. वित्त विभाग (व्यय-१) /अर्थसंकल्प -१३
१९. सामाजिक न्याय, क्रिडा व विशेष सहाय्य विभाग/आदिवासी विकास विभाग,
मंत्रालय, मुंबई-३२
२०. ग्राम विकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई
२१ निवडनस्ती (कार्यासन-४अे), कृषी व पदुम विभाग.